परिवहन उप आयुक्त (वरीष्ठश्रेणी) पदावर
पदोन्नती देणेबाबत ...

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** एमव्हीडी ०७१५/प्र.क्र.१८० /परि-४
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३१ ऑगस्ट, २०१७.

**शासन निर्णय:-**

मोटार वाहन विभागातील खालील २ प्रादेशिक परिवहन अधिकारी यांना विभागीय पदोन्नती समितीने मान्य केलेल्या निवडसूचीनुसार "परिवहन उप-आयुक्त (वरीष्ठश्रेणी)" या पदावर रु १५६००-३९,१०० (ग्रेड पे रु.६९००) या सुधारीत वेतन संरचनेत तात्पुरत्या व तदर्थ स्वरूपात खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

१) सदर अधिकाऱ्यांची पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची राहील व वरिष्ठ संवर्गात ज्येष्ठतेकरीता ग्राह्य धरता येणार नाही. त्या संवर्गात वेतनाव्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ मिळणार नाहीत.

२) सदर पदोन्नती केवळ ११ महिन्याकरीता देण्यात येत असून त्यानंतर सदर पदोन्नती चालू ठेवावयाची असल्यास ११ महिन्यांच्या कालावधीनंतर त्या-त्या वेळी खंड देण्यात येईल.

| अ.क्र | ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्याचे नाव | वाटप केलेला महसूली विभागीय संवर्ग | पदोन्नतीने प्रस्तावित पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १. | ९ | श्री. राजेंद्र हरी कदम | कोकण-२ | परिवहन उप आयुक्त, परिवहन आयुक्त कार्यालय |
| २. | १४ | श्री. गोविंद सैदाणे | कोकण-२ | परिवहन उप आयुक्त, परिवहन आयुक्त कार्यालय |

२. उपरोक्त पदोन्नती ही तदर्थ धर्तीवर व मा. उच्च न्यायालयातील रिट पिटीशन क्रमांक ८४५२/२००४ आणि २७९५/२०१५ या याचिकांच्या निकालाच्या अधीन राहून देण्यात येत आहे. त्यामुळे सदर रिट याचिकेत अंतिमत: दिल्या जाणाऱ्या आदेशामुळे हे पदोन्नतीचे आदेश बाधित होणार असल्यास, या आदेशांच्या अनुषंगाने पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांना सेवाज्येष्ठता किंवा आर्थिक फायद्यांसदर्भात मागणी करण्याचा हक्क राहणार नाही.

३. सदर पदोन्नतीनंतरची पदस्थापना सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना दि.२८.०४.२०१५, दि.१६.७.२०१५ , दि. १५.६.२०१७ व दि.१९.७.२०१७ मधील संवर्ग वाटपाच्या तरतुदीनुसार करण्यात आली आहे.

४. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी वरील अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच पदोन्नती वरील अधिकाऱ्यांनी त्यांच्या पदाचा कार्यभार कार्यालय प्रमुखांचे सल्ल्याने अन्य अधिकाऱ्याकडे सोपवून, तात्काळ कार्यमूक्त व्हावे व पदोन्नतीच्या ठिकाणी तात्काळ कार्यभार स्विकारावा. परिवहन आयुक्त यांनी संबंधित परिवहन उप आयुक्त यांना पदभार देणेबाबत स्वतंत्रपणे आदेश निर्गमीत करावेत.

५. सदर आदेश प्राप्त होताच वरील अधिकाऱ्यांनी पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे व रुजू झाल्याचा दिनांक परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई यांना कळवावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८३११३२८१६४६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: CN = Kadam Dattatray Hanmant, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2017.08.31 19:39:02 +05'30'

**(द. ह. कदम)**

अवर सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. संबंधित परिवहन उप-आयुक्त (वरीष्ठश्रेणी) (परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत)
४. सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी, महाराष्ट्र राज्य
५. सर्व उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, महाराष्ट्र राज्य
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९. निवडनस्ती/परि-४